अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास
महामंडळाची स्थापना

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
शासन निर्णय क्रमांक-अमामं १९९८/प्र.क्र.३६३/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय भवन १४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक :२७नोव्हेंबर १९९८.

शासन निर्णय :

मागासवर्गीयांच्या कल्याणासाठी राज्यात राज्य शासनातर्फे शैक्षणिक, आर्थिक उन्नती व सामाजिक प्रगतिसाठी समाजातील वेगवेगळ्या प्रवर्गासाठी विकास महामंडळांची स्थापना करण्यात आलेली आहे. राज्यात आर्थिकदृष्ट्या मागास असलेल्या घटकांची संख्या मोठ्या प्रमाणात आहे. या समाजाच्या सामाजिक विकास करणे, विशेष करून या समाजातील सुशिक्षित बेरोजगार तरुणांकरिता रोजगार व स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करून देण्याकरिता आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांच्या विकासासाठी महामंडळ स्थापनेचा निर्णय राज्य शासनाने दिनांक २९ ऑगष्ट १९९८ रोजी घेतला. या निर्णयास अनुसरून राज्यातील आर्थिकदृष्ट्या दुर्बल असलेल्या सुशिक्षित व्यक्तींसाठी त्यांच्या कर्तबगारीला निधीचे पाठबळ देवून त्यांच्या आर्थिक उन्नतीचा मार्ग खुला करण्यासाठी त्यांच्यासाठी स्वयंरोजगाराच्या योजना राबवून त्यात येणा-या अडचणी दूर करण्यासाठी 'अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाची स्थापना' करण्याचे शासनाने ठरविले.

२. हे महामंडळ कंपनी कायद्याच्या १९५६ च्या अंतर्गत नोंदणीकृत करण्यात येईल. कंपनी कायद्याच्या प्रत्यक्ष नोंदणीच्या दिवसापासून हे महामंडळ अस्तित्वात येईल. या महामंडळाचे नांव 'अणासाहेब पाटील आर्थिक मागास महामंडळ मर्यादित' असे राहील.

३. या महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रु.५०/-कोटी इतके राहील. दरवर्षी या महामंडळाच्या भाग भांडवलासाठी निधीच्या उपलब्धतेनुसार तरतूद केली जाईल. तसेच महामंडळाच्या आस्थापनेवरील खर्चासाठी देखील तरतूद केली जाईल. महामंडळाचे मुख्य कार्यालय मुंबई येथे राहील.

४. या महामंडळाचे संचालक सदस्यांची संख्या जास्तीत जास्त १५ इतकी राहील. यामध्ये सचिव, रोजगार व स्वयंरोजगार, संचालक , रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, राष्ट्रीय मागासवर्गीय विकास मंडळाचा प्रतिनिधी व महामंडळाचे व्यवस्थापकीय संचालक हे शासकीय सदस्य म्हणून रहातील.

५. संचालक मंडळाची रचना खालीलप्रमाणे राहील -

| | | |
|---|---|---|
| १ | अध्यक्ष | |
| २ | उपाध्यक्ष | |
| ३ | सचिव, रोजगार व स्वयंरोजगार | सदस्य |
| ४ | संचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, नवी मुंबई | सदस्य |
| ५ | राष्ट्रीय मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळाचा प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | महामंडळाचे व्यवस्थापकीय संचालक | सदस्य सचिव |
| ७ | इतर ९ अशासकीय सदस्य | सदस्य |

GR- 200201 211803 40000 - 2600

६. या महामंडळावरिता नेमण्यात येणारा कर्मचारीवृंद हा नवीन भरतीद्वारे न नेमता शासनाच्या इतर महामंडळातील अतिरिक्त ठरणाऱ्या कर्मचाऱ्यांमधून समायोजनाद्वारे नियुक्त करण्यात यावा.

७. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे ३०८६/१२, दि.२७.९.९८, क्रमांक-१८६/१४८३, दि.२३.१०.९८ व क्रमांक-४९५/व्यय-५, दि.१४.११.१९९८ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या महामंडळाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व उर्वरित संचालकांची नेमणूक शासनाद्वारे केली जाईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुरेश साळवी )
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत
मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री रोजगार व स्वयंरोजगार यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री, रोजगार व स्वयंरोजगार यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२
प्रधान सचिव, नियोजन
प्रधान सचिव, वित्त
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग
संचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, महाराष्ट्र राज्य, कोकणभवन, नवी मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा अधिकारी, मुंबई
संचालनालयातील सर्व विभाग
निवड नस्ती, रोखये.

GR-200201211803400000-2600